**राज्य योजना सन २०१८-१९ अंतर्गत प्रशासकीय इमारतीचे बांधकाम (४४०६ ००२६) मुख्य वनसंरक्षक (प्रा.) कोल्हापूर (चिपळूण) व गडचिरोली (आलापल्ली) वनवृत्तातील प्रशासकीय इमारतीच्या बांधकामासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१८/प्र.क्र.१९४/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०६ जून, २०१८

**वाचा :-** १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष १/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.०६/२९४/२०१८-१९, दि. २३.०५.२०१८ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

सन २०१८-१९ राज्य योजनेअंतर्गत प्रशासकीय इमारतीचे बांधकाम (४४०६ ००२६) या लेखाशिर्षाखाली रू. ३३००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१८-१९ करिता महसूली शिर्षांतर्गत एप्रिल ते डिसेंबर या ९ महिन्यांच्या कालावधीकरिता ७०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय प्रणालीवर रु.२३१०.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्याकरिता उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

सदर योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या नियतव्ययाच्या अनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून संदर्भ क्र.२ अन्वये मुख्य वनसंरक्षक (प्रा.) कोल्हापूर (चिपळूण वनविभाग) व गडचिरोली (आलापल्ली वनविभाग) वनवृत्तातील प्रशासकीय इमारतीच्या बांधकामासाठी एकूण रु.२३५.१२ लक्ष रकमेच्या नवीन बाब प्रस्तावास शासन मंजूरी प्रदान करुन अनुदान उपलब्ध करुन देण्याकरीता विनंती केली आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

राज्य योजना सन २०१८-१९ करिता प्रशासकीय इमारतीचे बांधकाम (४४०६ ००२६) या योजनेमधून मुख्य वनसंरक्षक (प्रा.) कोल्हापूर (चिपळूण वनविभाग) व गडचिरोली (आलापल्ली वनविभाग) वनवृत्तातील खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे प्रशासकीय इमारतीच्या बांधकामासाठी रु.२३५.१२ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | वृत्त | वनविभाग | कामाचा तपशिल | सन २०१८-१९ करीता प्रस्तावित रक्कम (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | मुख्य वनसंरक्षक (प्रा.) कोल्हापूर | चिपळुण | मौजे चिपळूण येथे निरीक्षण कुटी बांधणे घटक-१ | ७०.९८ |
| | | | निरीक्षण कुटीसाठी बाहय गृहाचे बांधकाम करणे घटक-१ | १३.८४ |
| | | | **(A) एकूण:-** | **८४.८२** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | मुख्य वनसंरक्षक (प्रा.) गडचिरोली | आलापल्ली | मार्कंडा वनपरिक्षेत्रातील मार्कंडा येथे प्रकार-१ चे (S/U) निवासस्थान बांधकाम-१ | २०.०७ |
| | | | घोट वनपरिक्षेत्रातील घोट येथे प्रकार-१ चे (D/U) निवासस्थान बांधकाम-२ | ४३.४१ |
| | | | आलापल्ली वनपरिक्षेत्रातील आलापल्ली येथे प्रकार-१ चे (D/U) निवासस्थान बांधकाम-A-२ | ४३.४१ |
| | | | आलापल्ली वनपरिक्षेत्रातील आलापल्ली येथे प्रकार-१ चे (D/U) निवासस्थान बांधकाम-B-२ | ४३.४१ |
| (B) **एकूण:-** | | | | **१५०.३०** |
| (A + B) **एकूण:-** | | | | **२३५.१२** |

उपरोक्त अनुदानाचा वापर करण्याच्या दृष्टीने (४४०६ ००२६) या लेखाशिर्षा अंतर्गत विहीत केलेल्या अटी व शर्तीचे पालन करणे संबंधितावर बंधनकारक राहील.

१. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
२. शासन निर्णय दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अनुसार नियम पुस्तिकेच्या परिच्छेद ४०१ मध्ये नमुद केल्यानुसार निविदा प्रक्रियेत खरेदी किंमत रु.तीन लाख व त्यापेक्षा अधिक असल्यास ई-निविदा प्रणालीचा वापर करावा.
३. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.
४. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. तसेच सदरहू विकासाची कामे सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात पूर्ण करण्यात यावीत. सदरहू रक्कम खर्ची पडल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.
५. प्रस्तावित सर्व कामांना सक्षम प्राधिकारी यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी आहे यांची खात्री करुनच कामे करावीत. तसेच सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) कायदा १९८०, भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ मधील तरतुदींचा भंग होणार नाही तसेच सर्वोच्च न्यायालय/उच्च न्यायालय/केंद्र शासनाच्या व्याघ्र संवर्धन प्राधिकरण यांनी दिलेल्या मार्गदर्शक सुचना/आदेशांची अवहेलना होणार नाही याची सुध्दा दक्षता घ्यावी.
६. प्रस्तावित कामांमध्ये निसर्गपूरक असलेले साहित्याचा जास्तीत जास्त वापर करावा.
७. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या अटीची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.
८. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-१०, प्रधान लेखाशिर्ष ४४०६, वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च, राज्य योजना अंतर्गत योजना, (०१) वनीकरण, (०७०) दळणवळण व इमारती, (००) (०२) वनातील इमारती बांधकाम (४४०६ ००२६) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करिता उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०७११२१२४४४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.06.07 11:24:07 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर / गडचिरोली
४. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
६. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
७. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
८. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)